**“Ease of doing business" च्या अनुषंगाने न्यायालयात जमा करावयाच्या दंडाच्या रकमा व इतर रकमा स्वीकृत करण्यासाठी राज्यातील सर्व जिल्हा व तालुका न्यायालयांमध्ये Targeted bank account उघडण्याकरीता मंजुरी देणेबाबत आणि त्याबाबतचे त्रिपक्षीय कराराच्या मसुद्दास मंजुरी देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण - २०१८/प्र.क्र. २६/का.७**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २८ जानेवारी, २०२०.

<u>वाचा</u> :- १) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण - २०१८/प्र.क्र. २६/का.७, दिनांक १८.०४.२०१८.
२) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण - २०१८/प्र.क्र. २६/का.७, दिनांक २८.०८.२०१८.
३) केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई यांचे पत्र क्र. Spl./Comp./६४८/२०१९, दिनांक २१.०९.२०१९.

<u>प्रस्तावना</u> :-

"Ease of doing business" च्या अनुषंगाने न्यायालयात जमा करावयाच्या दंडाच्या रकमा व इतर रकमा स्वीकृत करण्यासाठी प्रायोगिक तत्वावर जिल्हा सत्र न्यायालय, पुणे या कार्यालयास स्टेट बँक ऑफ इंडिया मध्ये नवीन Targeted bank account उघडण्यास दिनांक १८.०४.२०१८ रोजीच्या संदर्भ क्रमांक१ वरील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे.

संदर्भ क्रमांक २ वरील शासन निर्णय अन्वये पुणे जिल्ह्यातील सर्व न्यायालयांच्या आस्थापनांकरिता न्यायालयात जमा करावयाच्या दंडाच्या रकमा व इतर रकमा ई-पेमेंटचा वापर करुन स्वीकृत करण्यासाठी स्टेट बँक ऑफ इंडिया मध्ये स्वतंत्रTargeted bank account उघडण्यास दिनांक २८.०८.२०१८रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे.

मा. केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई यांचे संदर्भ क्रमांक ३ येथील पत्रान्वये "Ease of doing business" च्या अनुषंगाने न्यायालयात जमा करावयाच्या दंडाच्या रकमा व इतर रकमा स्वीकृत करण्यासाठी राज्यातील सर्व जिल्हा व तालुका न्यायालयांमध्ये Targeted bank account उघडण्याकरिता व तसेच त्याबाबतच्या त्रिपक्षीय कराराच्या मसुद्यास परवानगी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार खालील शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

<u>शासन निर्णय</u> :-

राज्यातील सर्व जिल्हा व तालुका न्यायालयांच्या आस्थापनांकरिता न्यायालयात जमा करावयाच्या दंडाच्या रकमा व इतर रकमा ई-पेमेंटचा वापर करुन स्वीकृत करणेसाठी स्टेट बँक ऑफ इंडिया मध्ये स्वतंत्र Targeted Bank Account उघडण्यास दिनांक १८.०४.२०१८ आणि

२८.०८.२०१८ रोजीच्या शासन निर्णयात नमूद करण्यात आलेल्या पुढील अटीं व शर्तींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे :-

१) लेखाशिर्षनिहाय व अदातानिहाय बँक स्क्रोल कोषागारास सादर करण्यात यावा.
२) न्यायालयाला प्रथमत: त्यांच्याकडे जमा झालेल्या रकमांची यादी वSBI मध्ये प्रत्यक्षात या यादीतील जमा झालेल्या रकमांचा ताळमेळ घ्यावा लागेल व त्यानंतर कोषागाराशी याच रकमांचा ताळमेळ घ्यावा लागेल. न्यायालयांच्या PLA मध्ये अंतिम नोंदी घेताना कोषागाराच्या लेख्यात समाविष्ट करण्यात आलेल्या रकमांचा अंतर्भाव करावा. SBIकडे अयशस्वी व्यवहारांच्या (Unsuccessful Transaction) ज्या रकमा जमा झालेल्या असतील त्या रकमांचा अंतर्भाव कोषागाराच्या लेख्यात नसेल.
३) महाराष्ट्र कोषागार नियम १९६८ मधील नियम क्रमांक ५१२ मधील अटी व शर्तींचे पालन करण्यात यावे.
४) कोषागार कार्यालयाकडून महालेखापाल कार्यालयास सादर करण्यात येणाऱ्या मासिक खाते अहवालाच्या पध्दतीत कोणताही बदल होणार नाही.
५) शासनाच्या जमा होणाऱ्या रकमा एकत्रित निधीत/स्वीय प्रपंची लेख्यामध्ये तात्काळ जमा होतील याची दक्षता घेण्यात यावी.

राज्यातील सर्व जिल्हा व तालुका न्यायालयांच्या आस्थापनांकरिता न्यायालयात जमा करावयाच्या दंडाच्या रकमा व इतर रकमा स्वीकृत करणेसाठी स्टेट बँक ऑफ इंडिया मध्ये स्वतंत्र Targeted Bank Account उघडण्याबाबतचे त्रिपक्षीय कराराच्या मसुद्यास मा. मुख्य सचिव महाराष्ट्र शासन यांनी मान्यता दिली आहे.

हा शासन निर्णय संचालनालय, लेखा व कोषागारे, मुंबई यांच्या सहमतीनुसार तसेच वित्त विभाग कोषा प्रशा-५ या कार्यासनाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३५६/२०१९/कोषाप्रशा -५, दिनांक ०४.१०.२०१९ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००१२८१२५५५१३९१२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Nitin Virsen Jiwane

Digitally signed by Nitin Virsen Jiwane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law and Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=eaafa52b8f5b995089773c42d6ed2475cd061a337b724d471400fbcfb074e051, serialNumber=38da45fc182de9210d4220cd41371018a4d6f00892e5d1478cba8413afb06c03, cn=Nitin Virsen Jiwane
Date: 2020.01.28 12:56:38 +05'30'

**( नि. वि. जिवणे )**
**विधि सल्लागार-नि-सह सचिव**

**प्रति,**

१. मा. प्रबंधक उच्च न्यायालय, मुंबई
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१/२,मुंबई/नागपूर,
३. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर ,

४. केंद्रीय प्रकल्प समन्वयक, ई-कोर्ट प्रकल्प, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई.

५. वित्त विभाग (व्यय-५, कोषाप्रशा--५)

६. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,

७. सर्व जिल्हा व तालुका न्यायालये,

८. सर्व जिल्हा व तालुका कोषागारे अधिकारी,

९. कार्यासन अधिकारी/कार्यासन २३ व २४ विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई,

१०.निवड नस्ती/का.७.